**पोलीस पाटील भरतीकरीता लेखी परिक्षेच्या नियोजनकरीता समिती गठीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीव्हीपी ०६१३/प्र.क्र. ३१२/पोल-८

जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई - ४०० ००५,
दिनांक: २७ ऑगस्ट, २०१४.

**वाचा:**

शासन निर्णय क्रमांकः बीव्हीपी ०६११/प्र.क्र. ४१९/पोल-८, दि. २३.८.२०११.

**प्रस्तावना:**

पोलीस पाटील पदावरील नियुक्तीसाठी २० गुणांची तोंडी परिक्षा घेण्याकरीता उपरोक्त शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे पोलीस पाटील पदावरील नियुक्तीकरीता ८० गुणांच्या लेखी परिक्षेचे नियोजन करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील पोलीस पाटील पदावरील नियुक्तीकरीता ८० गुणांची लेखी परिक्षा ठेवण्यात आलेली आहे. यापूर्वी या लेखी परिक्षेचे संपूर्ण कामकाज उपविभागीय दंडाधिकारी यांच्याकडून केले जात होते. लेखी परिक्षेत अधिक पारदर्शकता यावी तसेच लेखी परिक्षेची प्रश्नपत्रिका तयार करणे, परिक्षेचे आयोजन करणे व परिक्षा घेऊन पत्रिका तपासून निकाल तयार करणे याकरीता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| उप विभागीय दंडाधिकारी | -: | अध्यक्ष. |
| उपविभागीय पोलीस अधिकारी | -: | सदस्य. |
| संबंधित तालुक्याचे तहसिलदार | -: | सदस्य सचिव |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१३३३४०६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: CN = Charushila Chandrakant Tambekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.08.27 15:42:55 +05'30'

**चारुशीला तांबेकर**
शासनाच्या सह सचिव

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व मुंबई उपनगरे वगळून).
४. सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.
५. सर्व उपविभागीय अधिकारी (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)
६. निवडनस्ती (पोल-८)